सामाजिक न्याय विभागाच्या विशेष घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जातीच्या कृषीपंप ग्राहक लाभार्थ्यांना वीज दरात सवलतीसाठी सन २०२३-२४ मध्ये (रु.३१.३६ कोटी) (रोखीने) अनुदान वितरण मागणी क्र.एन-३ (लेखाशिर्ष २८०१५६६१).

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**

**शासन निर्णय क्र.पुरमा-२०२३/प्र.क्र.१०६/ऊर्जा-३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ३० मार्च, २०२४

**संदर्भ**:- १.वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२/०४/२०२३

२.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो), दि.२४/०८/२०२३. दि.७/११/२०२३. दि.२९/०२/२०२४ व दि.३०/०३/२०२४.

३. उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधिवी-२०२३/प्र.क्र.३८/ऊर्जा-३, दि.२४/०८/२०२३, दि.१७/११/२०२३ व दि.०५/०३/२०२४.

४. महावितरण कंपनीचे पत्र क्र.मु.अ.(वा.)/शासन/मागणी/सवलत/SCP)/००२१०४,दि.१९/०१/२०२४.

**प्रस्तावना** :-

राज्यातील कृषीपंपधारकांना दरवर्षी सवलतीच्या दरात वीज पुरवठा करण्यात येतो व त्याची प्रतिपूर्ती करण्यासाठी महावितरण कंपनीस अर्थसहाय्य देण्यात येते. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनुसूचित जाती विशेष घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती घटकाच्या वैयक्तिक लाभार्थी कृषीपंपधारकांना वीज दरात सवलत देण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने सन २०२३-२४ करिता महावितरण कंपनीस अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्यासाठी मुळ रु.१००.०० कोटी व पुरवणी रु.१०४.५२ कोटी अशी एकूण रु.२०४.५२ कोटी इतकी तरतूद केली आहे.

२. सदर तरतुदीपैकी शासन निर्णय क्र. ३ अन्वये एकूण रु.१७३.१६ कोटी इतका निधी महावितरण कंपनीस वितरित करण्यात आला आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील शासन परिपत्रकातील सुचनांच्या अनुषंगाने व वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने रु.३१.३६ कोटी इतकी तरतूद संदर्भिय शासन निर्णय क्र.२, दि.३०/०३/२०२४ अन्वये महावितरण कंपनीस वितरित करण्यासाठी प्रशासकीय विभाग म्हणून ऊर्जा विभागास उपलब्ध करुन दिली आहे. सदर तरतूद **रु.३१,३६,००,०००/-(रुपये एकतीस कोटी छत्तीस लाख फक्त)** महावितरण कंपनीस वितरित करण्याची बाब विचारधीन होती.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनुसूचित जाती विशेष घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती घटकाच्या वैयक्तिक लाभार्थी कृषीपंपधारकांना वीज दरात सवलत देण्यासाठी **रु.३१,३६,००,०००/- (रुपये एकतीस कोटी छत्तीस लाख फक्त)** महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबींचा खर्च "मागणी क्र. एन-३, २८०१ वीज, उप मुख्यलेखाशिर्ष ०५ पारेषण व वितरण,गौणशिर्ष ७८९ अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना, गट शिर्ष (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना,उप गट शिर्ष (०१)(०२) कृषीपंप ग्राहकांना वीज दरात सवलत (कार्यक्रम) योजना सांकेतांक (२८०१५६६१) ३३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित,मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून डॉ.गौरी पाटील, कार्यासन अधिकारी(ऊर्जा-३) आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ना.श्री.कराड, उप सचिव (ऊर्जा-३),उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी सदर मंजूर झालेली रक्कम रु.३१,३६,००,०००/-(रुपये एकतीस कोटी छत्तीस लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांचे नावे स्वतंत्ररीत्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम फक्त अनुसूचित जाती घटकांतर्गत लाभार्थ्यांवरच वीज दरात सवलतीपोटी खर्च होईल याची दक्षता विभाग स्तरावर उपसचिव, ऊर्जा-५ व महावितरण कंपनीने घ्यावी.

५. सदर निधी ज्या उद्देशासाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहील.

६. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर देयक हे सशर्त असून,वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.१२/०४/२०२३ च्या परिपत्रकातील सोबतच्या परिशिष्टातील अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक ३०/०३/२०२४ च्या शासन निर्णयानुसार व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.३९३/२०२४/व्यय-१४, दि.३०/०३/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३३०१७४००४१११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. GAURI RAKESH PATIL

Digitally signed by DR. GAURI RAKESH PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=1fb6342b2e518b7b62c5e76771a2798f4bed2e746f3e27ba3a43ef40e20d8979, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1B8FA6FD8474E1D5982D81B6510A6CD24CC422976DC8735D4C6A4C519341E344, cn=DR. GAURI RAKESH PATIL
Date: 2024.03.31 13:12:36 +05'30'

(डॉ.गौरी पाटील)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उपमुख्यमंत्री (ऊर्जा), यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५) सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.

६) मा. विरोधीपक्ष नेता ( विधानसभा व विधानपरिषद) मुंबई-३२यांचे खाजगी सचिव.
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
९) अपर मुख्य सचिव, (ऊर्जा) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१०) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई.-३२
११) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड,वांद्रे (पूर्व),मुंबई-५१.
१२) आयुक्त,समाज कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे.
१३) सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प-विघयो)मंत्रालय,मुंबई-३२.
१४) उप सचिव (ऊर्जा-५)उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१५) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१६) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१७) अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
१८) अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१९) वित्त विभाग (व्यय-१६) साधनसंपत्ती/अर्थसंकल्प, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२०) निवडनस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.